**पुराभिलेख संचालनालयामार्फत छायाचित्र व दुर्मिळ कागदपत्रांचे प्रदर्शन आयोजित करण्यास मंजूरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मपुवि-२०१७/प्र.क्र.५६/सां.का.२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२२ जुन, २०१७.

**वाचा :** संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्रमांक इएक्स्बी ६०१७/१६०३ दि. ११.०५.२०१७.

**शासन निर्णय :**

पुराभिलेख संचालनालयामार्फत कागल, जिल्हा कोल्हापूर येथे २६ जुन ते ३० जुन, २०१७ रोजी राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवनावर आधारीत दुर्मिळ छायाचित्रे व कागदपत्रांचे प्रदर्शन आयोजित करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी दि.११.०५.२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. आता राजर्षी छत्रपती शाहू महाराज यांच्या जीवनावर आधारित दुर्मिळ छायाचित्रे व कागदपत्रांचे प्रदर्शन दिनांक २६ जून ते ३० जून, २०१७ या कालावधीत कागल जिल्हा कोल्हापूर येथे आयोजित करण्यास व त्यासाठी रुपये १,५०,०००/- (रुपये एक लाख पन्नास हजार फक्त) च्या मर्यादेत खर्चास मान्यता देण्यात येत आहे. या प्रदर्शन कालावधीमध्ये सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात यावे. यासाठीचा खर्च वरील मंजूर तरतूदीतूनच भागविण्यात यावा. यासाठी स्वतंत्र रक्कम दिली जाणार नाही. या प्रदर्शनाच्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, पुराभिलेख संचालनालय यांनी शासनास सादर करावे.

३. या बाबतचा खर्च मागणी क्र. झेडडी-२,२२०५ कला व संस्कृती, (००) १०४ पुराभिलेख (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (२२०५ १७९५) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-तीन मधील अ. क्र.४, परिच्छेद क्रमांक २७ (२) मधील तरतुदीनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या आधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०६२२१७३२४९३६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Basawaraj Gurapadappa Saidanawaru

Digitally signed by Basawaraj Gurapadappa Saidanawaru
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d6e0176dd9f18c05af2af6161c960ec128aedd0d596986c8dfe46407b1ecbc13, serialNumber=0c50ec125ac79b1ecf0a06b6a256996713c819ae428f2e0aabe4415bbcaf5a54, cn=Basawaraj Gurapadappa Saidanawaru
Date: 2017.06.22 17:30:06 +05'30'

**( ब.गु.सैदानवरु )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई - ३२.
२) प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
३) संचालक,पुराभिलेख संचालनालय, मुंबई- ३२.
४) महालेखापाल, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई- ३२.
८) निवडनस्ती कार्यासन (सांका. -२).